**अतितात्काळ / अर्थसंकल्प प्राथम्य**

**आकस्मिकता निधीतून घेतलेल्या अग्रीमांची भरपाईबाबत.**
**(डिसेंबर, २०२१ चे हिवाळी अधिवेशन)**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : आकनि - २०२१/प्र.क्र.१०७/अर्थ-३.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०३ जानेवारी, २०२२.

संदर्भ :- वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. पूरक - २०२१/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि. १ नोव्हेंबर, २०२१.

**परिपत्रक**

सन २०२१ - २२ या वर्षाचे खर्चाचे पूरक विवरणपत्र दिनांक २२ डिसेंबर, २०२१ रोजी विधानमंडळास सादर करण्यात आले असून सदर पूरक खर्चाच्या विवरणपत्रात आकस्मिकता निधी भरपाईसाठी पूरक मागण्या समाविष्ट करण्यात आल्या आहेत. आकस्मिकता निधीतून घेण्यात आलेल्या सदर अग्रीम रकमा दर्शविणारे विवरणपत्र या सोबत पाठविण्यात येत आहे. "महाराष्ट्र (तृतीय पुरवणी) विनियोजन अधिनियम, २०२१" आता मंजूर झाला असल्याने संबंधित मंत्रालयीन विभागांना अशी विनंती करण्यात येते की, या परिपत्रकासोबतच्या विवरणपत्रात नमूद करण्यात आलेल्या बाबींवरील खर्च हा आता आकस्मिकता निधीच्या खर्च खाती टाकू नये व तसे संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांना कळवावे.

२. आकस्मिकता निधीतून मंजूर करण्यात आलेल्या अग्रीम रकमांच्या बाबतीत पुरवणी विनियोजने विधानमंडळाने मंजूर केलेली असून ती, "महाराष्ट्र (तृतीय पुरवणी) विनियोजन अधिनियम, २०२१" **(सन २०२१ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक -१७, दिनांक ३० डिसेंबर, २०२१)** यामध्ये समाविष्ट करण्यात आली आहेत. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - एक, महाराष्ट्र, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, या परिपत्रकासोबतच्या विवरणपत्रातील स्तंभ-४ मध्ये नमूद करण्यात आलेल्या रकमेतून झालेल्या खर्चाएवढ्या रकमेची आकस्मिकता निधीमध्ये भरपाई करण्यात यावी.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२२०१०३१७५०२०८९०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Mahadeo Mahadik
Digitally signed by Sanjay Mahadeo Mahadik
DN: CN = Sanjay Mahadeo Mahadik, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Finance Department
Date: 2022.01.03 17:51:18 +05'30'

**( सं. म. महाडीक )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**सोबत - आकस्मिकता निधी अग्रीमांचे विवरणपत्र**

**प्रत,**

१. सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र,मुंबई. (२५ प्रती)
३. महालेखापाल( लेखा परीक्षा),महाराष्ट्र,मुंबई. (२५ प्रती)
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र,नागपूर. (२५ प्रती)
५. महालेखापाल(लेखापरीक्षा),महाराष्ट्र,नागपूर.(२५प्रती)
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई. (५ प्रती)

७. सह संचालक, लेखा व कोषागारे,संगणक शाखा,५ वा मजला,नवीन प्रशासकीय भवन,मुंबई - ३२ (५ प्रती)

८. अपर संचालक (इ.आ.सं.) अर्थ व सां. संचालनालय,७ वा मजला,नवीन प्रशासकीय भवन,मुंबई-३२ (२ प्रती)

९. सर्व कोषागार अधिकारी.

१०. कार्यासन अधिकारी, प्रशासन-४, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

११. महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (क-शाखा), विधानभवन, मुंबई-३२.

१२. सर्व कार्यासन अधिकारी, अर्थसंकल्प शाखा, वित्त विभाग, आकस्मिकता निधीतील आगाऊ रकमांची आधीच भरपाई करण्यात आलेली असल्याने यासोबत जोडलेल्या विवरणपत्रात नमूद केलेल्या आकस्मिकता निधीच्या आगाऊ रकमांच्या संबंधातील खर्च आकस्मिकता निधीच्या खर्च खाती टाकला जात नाही, याची खात्री करुन घ्यावी.

१३. निवड नस्ती, अर्थ-३, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

# विवरणपत्र

## सन २०२१ चे (तृतीय) हिवाळी अधिवेशन डिसेंबर, २०२१ मध्ये भरपाई करण्यात आलेल्या आकस्मिकता निधी अग्रिमांचे विवरणपत्र.

| अ.क्र. | वित्त विभागाच्या ज्या ज्ञापनाद्वारे आगाऊ रक्कम मंजूर करण्यात आली त्या शासकीय ज्ञापनाचा क्रमांक व दिनांक | विषय | अग्रिमाची रक्कम (रुपये) | पुरवणी मागणीची रक्कम (रुपये) | पुरक मागणी चा पृष्ठ क्रमांक | पुरक मागणी चा बाब क्रमांक | अग्रिमांच्या वापरासंबंधी विभागाच्या आदेशाचा क्रमांक व दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| सामान्य प्रशासन विभाग | | | | | | | |
| २२३५ - सामाजिक सुरक्षा व कल्याण | | | | | | | |
| १. | क्र.आकनि-२०२१/प्र.क्र.२/अर्थ-१४, दिनांक १५ सप्टेंबर, २०२१ | सन १९७५ ते १९७७ मधील आणीबाणीच्या कालावधीत लोकशाहीकरिता लढा देण्याऱ्या व्यक्तींना आर्थिक मदत | १५,९९,७४,००० | १५,९९,७४,००० | ५ | ७ | क्र. बीयुडी-१४२०/प्र.क्र.६८/स्वासैक-१, दिनांक १५ सप्टेंबर, २०२१. |
| इतर मागास बहुजन कल्याण विभाग | | | | | | | |
| २२२५ - अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण | | | | | | | |
| २ | क्र.आकनि-२०२१/प्र.क्र.३/अर्थ-५, दिनांक ९ डिसेंबर, २०२१ | महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोगास स्थानिक स्वराज्य संस्थेमधील आरक्षणाशी संबंधित विनिर्दिष्ट कामे पार पाडण्यासाठी अग्रीम | ५,००,००,००० | ५,००,००,००० | १८३ | २४८ | क्र. आयोग-२०२१/प्र.क्र.१८१/मावक, दिनांक ९ डिसेंबर, २०२१. |
| | | | | | | | |

Sanjay Mahadeo Mahadik

Digitally signed by Sanjay Mahadeo Mahadik
DN: CN = Sanjay Mahadeo Mahadik, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Finance Department
Date: 2022.01.03 17:51:39 +05'30'

(सं. म. महाडीक)

अवर सचिव, महाराष्ट्र शासन